प्रादेशिक परिवहन कार्यालय, अकोला या कार्यालयाचे थकीत भाडे अदा करण्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२४/प्र.क्र. ७५/परि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक :- २७ मार्च, २०२४

**वाचा :-** १. गृह (परिवहन)विभाग,शासन निर्णय क्रमांक एमव्हिडी ०४१९ /प्र.क्र. ८१/परि.-४, दि. २०.०४.२०११

२. परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र. पकाबां (३०) १२१५/ न.क्र.१४ / का.१०(१) / २०२४ / जा.क्र.३४४७, दि.१८.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, अकोला या कार्यालयाचे थकीत भाडे रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, अकोला कार्यालयासाठी जागा भाडेतत्वावर घेण्यास दि.२०.०४.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार परिवहन आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावनुसार सदरील जागेचे माहे जुलै, २०२० ते सप्टेंबर, २०२१ पर्यंतचे १५ महिन्यांचे एकुण इमारत भाडे रक्कम रुपये १०,५९,६३०/- (अक्षरी रुपये दहा लाख एकोणसाठ हजार सहाशे तीस फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रादेशिक परिवहन कार्यालय, अकोला या कार्यालयाच्या भाडेपोटी येणारा खर्च " मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०२) प्रादेशिक कार्यालये, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालये (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००३६) १४ भाडेपट्टी व कर " या लेखाशीर्षाखाली २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरिता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१, उपविभाग-१, अ.क्र.६, नियम क्र.४० अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१७१०००९१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHARAT
RAMCHANDRA LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.03.27 17:19:16 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अप्पर मुख्य सचिव
३) महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) परिवहन उप आयुक्त (प्रशासन/निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
६) प्रादेशिक परिवहन अधिकारी, अकोला
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला
८) अवर सचिव/कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (परि-४)